**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त केंद्र शासनाने स्थापन केलेल्या डॉ.बाबासाहेब आंबेडकर फाऊंडेशनच्या धर्तीवर महाराष्ट्रात "डॉ.बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठानची" स्थापना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : सान्यावि-२०१७/प्र.क्र.१०३/बांधकामे**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २७ मार्च, २०१७

<u>संदर्भ</u> :- १.शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक सान्यावि २०१५/ प्र.क्र. १६३ / बांधकामे, दि. ९ ऑक्टोबर, २०१५.

२.महासंचालक,डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे यांचे पत्र क्र.BARTI/Pune/२०१६-१७/९९८ दि.६/३/२०१७

**<u>प्रस्तावना</u> :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे सामाजिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रातील योगदान व आधुनिक भारत घडविण्यामध्ये त्यांचा मोलाचा सहभाग या प्रति कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी आणि त्यांच्या संघर्षाची समाजाला प्रेरणा मिळावी यासाठी दिनांक १४ एप्रिल, २०१५ ते १४ एप्रिल, २०१६ हे वर्ष "समता व सामाजिक न्याय वर्ष" म्हणून साजरे करण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. या शासन निर्णयातील भाग-१ मधील अनुक्रमांक ४ नुसार केंद्र शासनाने स्थापन केलेल्या डॉ.बाबासाहेब आंबेडकर फाऊंडेशनच्या धर्तीवर महाराष्ट्रात -डॉ.बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठानची स्थापना करणे प्रस्तावित आहे.याअनुषंगाने डॉ.बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठान स्थापना करण्याचा उद्देश विचारात घेऊन कंपनी कायद्यामधील कलम ८ अंतर्गत डॉ.बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठानची स्थापना करण्यात यावी असे निदेश मा.मंत्री (सा.न्या.व वि.स.) यांनी दिले आहेत.याबाबत महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे यांच्याकडुन संदर्भ क्र.२ नुसार सविस्तर प्रस्ताव प्राप्त झाला आहे.सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने यासाठी निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्ष हे समता व सामाजिक न्याय वर्ष म्हणून साजरे करण्यासाठी सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पात "मागणी क्र. एन-३, २२२५-अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९-अनुसूचित जाती घटक योजना, ०२-भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे (योजनांतर्गत-दत्तमत) लेखाशीर्ष २२२५D८२३" या लेखाशीर्षाखाली रू.१७० कोटी (रू.एकशे सत्तर कोटी फक्त) निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. यातील रू.१० कोटी इतका निधी डॉ.बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठानची स्थापना करण्यासाठी राखीव आहे.सदर नियतव्ययातील ८०% निधी बीडीएस वर उपलब्ध करण्यात आला आहे.

२. उपरोक्तपणे सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात डॉ.बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठानची स्थापना करण्यासाठी उपलब्ध अर्थसंकल्पित रू.१० कोटी नियतव्ययातील नियंत्रक अधिकारी आयुक्त,समाजकल्याण,पुणे या कार्यालयास वितरीत करण्यात आलेली रू.८ कोटी (रू.आठ कोटी फक्त)तरतूद आहरीत करून सदरहू तरतूद महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण केंद्र, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यासाठी त्या कार्यालयास उपलब्ध करून देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. यासाठी आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्याकडुन महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण केंद्र, पुणे यांना वरीलप्रमाणे उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीतून, करण्यात आलेल्या कामांच्या प्रगतीचा व खर्चाचा अहवाल महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण केंद्र, पुणे यांच्याकडुन प्राप्त करून खर्चाचा तपशिल आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांनी वेळोवेळी शासनास सादर करावा.

३. यावरील खर्च हा “मागणी क्र. एन-३, २२२५-अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९-अनुसूचित जाती घटक योजना, ०२-भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे (योजनांतर्गत-दत्तमत) लेखाशीर्ष २२२५D८२३” या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती निमित्त करावयाच्या कार्यक्रमाकरीता मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीस संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२७१११२०७९१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh
Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd83646 7a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2017.03.27 11:16:55 +05'30'

(दि.रा.डिंगळे)

सह सचिव , महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.

४) सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
६) प्रधान सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२
७) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) महासंचालक,.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण केंद्र पुणे डॉ,
९) मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव
१०) मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव
११) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, पुणे.
१२) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण विभाग,महाराष्ट्र राज्य
१३) जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे
१४) निवडनस्ती, कार्यासन-बांधकामे, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मुंबई.